नाहीं, न कृपाला, न अश्वत्थाम्याला! मग त्या सूतपुत्र कर्णाचें तर नांवच नको घ्यावयाला! असलें अमोल अस्त्र मजजवळ आहे, तथापि असल्या अस्त्रांनीं रणांत सामान्य जनांशीं लढणें योग्य नसल्यानें आम्ही सरळ साधे आयुधांनींच शत्रूंना जिंकूं. असो; ही माझी गोष्ट झाली. पण मजशिवाय तुझे जे हे इतर साह्यकर्ते आहेत, तेही सर्व मोठे शूर, दिव्यास्त्रकोविद व युद्धोत्सुक असून धनुर्वेदांत निष्णात व केवळ अजिंक्य असे आहेत. हे धर्मराजा, हे रणांत देवसेनेला देखील फस्त करतील. हे ते कोण म्हणशील तर ऐक. शिखंडी, युयुधान, पार्षत धृष्टद्युम्न, भीमसेन, नकुलसहदेव, युधामन्यु, उत्तमौजा, विराट-द्रुपद ही जोडी-ही आपलेकडील भीष्मद्रोणांचीच जोडी समजा-पराक्रमी शंख, बलाढ्य घटोत्कच व त्याचा महापराक्रमी पुत्र अंजनपर्वा; युद्धनिपुण, महापराक्रमी व आपला पूर्व साह्यकर्ता सात्यकि, बलवान् अभिमन्यु व द्रौपदीचे पांच पुत्र व सर्वांचे अग्रस्थानीं त्रैलोक्यसंहाराविषयींही समर्थ असे आपण. असें म्हणण्याचें कारण, हे महाराजा, आपले पराक्रमाविषयीं माझी तरी अशी खातरी आहे कीं, आपण केवल प्रति इंद्र आहां, व रागानें ज्या कोणाकडे पाहाल त्याचें जागच्या जागीं भस्म होईल!'

## अध्याय एकशें पंचाणवावा.

--:०:--

### कौरवसेनेचें निर्याण.

वैशंपायन सांगतातः—नंतर लखलखीत उजाडल्यावर, राजा दुर्योधनाचे आज्ञेवरून तत्पक्षीय राजे पांडवांवर चाल करण्याकरितां तयार झाले. सर्वांनीं स्नान करून, शुचिर्भूत होऊन पुष्पमाला व शुभ्र वस्त्रें धारण केलीं होतीं; व स्वस्तिवाचनें करून आणि अग्नींत होम देऊन हातांत शस्त्रें व निशाणें घेऊन ते तयार झाले होते. ते सर्वच शूर, ब्रह्मनिष्ठ, सदाचारसंपन्न, संग्रामकुशल व दुर्योधनाचे हेतूप्रमाणें चालणारे होते. ते मोठे बलाढ्य असून युद्धांत शत्रूंना जिंकण्याविषयीं उत्कंठित झालेले, लक्षपूर्वक युद्ध करणारे व परस्परांचे विश्वासांतले होते. अवंतींतील विंद व अनुविंद व बाल्हीकांसह कैकेय हे सर्व द्रोणांना पुढें करून निघाले. अश्वत्थामा, जयद्रथ, दाक्षिणात्य व प्रतीच्य, पर्वतांतील राजे, गांधारराज शकुनि, पूर्व व उत्तर दिशांचे सर्व राजे, शक, किरात, यवन, शिबि व वसाति हे सर्व महारथ आपापल्या सेनेसह भीष्मांभोंवतीं जमून त्यांसह एक दुसरी टोळी करून निघाले. ससैन्य कृतवर्मा, महारथ त्रिगर्त, शल शल्य, भूरिश्रवा, कोसलाधिप बृहद्रथ व दुर्योधनप्रमुख सर्व धार्तराष्ट्र बंधु यांचा एक तिसरा जंपू निघाला. मग सर्वेही मैदानांत एके ठिकाणीं मिळाल्यावर धृतराष्ट्रपुत्र हे ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें सर्वांना भेटून, चिलखतें चढवून व सज्ज होऊन कुरुक्षेत्राच्या पश्चिमार्धांत उभे राहिले.

हे जनमेजया, दुर्योधनानें त्या स्थलीं आपणाकरितां जी छावणी तयार करविली होती, ती इतकी सुंदर होती कीं, नेहमीं हस्तिनापुरांत राहाणाऱ्या कुशल परीक्षकांना देखील हें दुसरें हस्तिनापुर नव्हे असे म्हणण्याची सोय नव्हती. इतर राजांकरितांही त्यानें त्याच नमुन्यांचीं व दुष्प्रवेश्य अशीं अनेक शिबिरें तयार करविलीं. हे राजा, ह्या एकंदर शिबिरांनीं पांच योजनेंपर्यंत कुरुक्षेत्राची वर्तुलाकार जागा व्यापिली होती, व एकेका छावणींत किती तरी तुकड्यांचा समावेश झाला होता. त्या शिबिरांत उत्तमोत्तम भक्ष्यभोज्यादि सर्व सामग्री सिद्ध असून ती सुरक्षित होती. अशा त्या समृद्ध शिबिरांतून, त्या राजांनीं, आपापल्या

रुचीला अनुकूल व आपल्या परिवाराला पुरत अशीं पाहून तळ दिला. दुर्योधनानें ते सर्वही राजे, त्यांचे सैनिक, पहारेकरी, अश्वसेवक, गजसेवक, त्याचप्रमाणें तेथील सर्व शिल्पी, सूत, मागध, बंदी, वाणी, गणिका, दूत व प्रेक्षक मंडळी या सर्वांचे पोटापाण्याची व्यवस्था स्वतः:चे देखरेखीखालीं करवून त्या सर्वांचा रीतीप्रमाणें परामर्श घेतला.

## अध्याय एकशें शाण्णवावा.

—:०:—

### पांडवसेनानिर्याण.

वैशंपायन सांगतातः—हे जनमेजया, इकडे युधिष्ठिर धर्मानेंही धृष्टद्युम्नप्रभृति वीरांस युद्धार्थ बाहेर पडण्याविषयीं आज्ञा दिली. चेदि, काशि व करूपक या देशांतील सेनांचा नायक दृढविक्रम व शत्रुघातक धृष्टकेतु यालाही सूचना केली. त्याप्रमाणेंच विराट द्रुपद, युयुधान, शिखंडी, महाधनुर्धर युधामन्यु व उत्तमौजा यांसही विनंती केली. युधिष्ठिराचे सूचनेबरोबर ते सर्व वीर चित्रविचित्र कवचें व देदीप्यमान कुंडलें घालून वीरश्रीनें युक्त होत्साते उभे राहिले असतां, घृत घालून प्रज्वलित केलेले वेदींवरील अग्निच काय अथवा आकाशांतील उज्ज्वल ग्रहच काय, असे शोभूं लागले. सर्व सैनिक तयार झालेसे पाहून युधिष्ठिरानें सर्वांचा योग्यतेनुरूप सन्मान करून सर्वांस निघण्याची शेवटली आज्ञा दिली आणि सर्व सैनिक, राजे, बाहेरचे पहारेकरी, हत्ती व घोडे यांवरील नोकर व कारागीर लोक यांस उत्कृष्ट भक्ष्य, भोज्य वगैरे मिळण्याविषयीं सेवकांना आज्ञा केली.

नंतर द्रौपदीचे पांचही पुत्र, थोरांड शरीराचा अभिमन्यु या सर्वांस धृष्टद्युम्नाला झोरक्या करून लावून दिलें. भीम, युयुधान धनंजय वगैरेंची दुसरी टोळी करून पाठविली. हे राजा, ते पांडववीर युद्धोत्सुक होऊन जेव्हां अंगावर आपला साज चढवूं लागले, हर्षानें इकडे तिकडे फिरूं लागले, व लगबगीनें इतस्ततः धांवूं लागले, त्या वेळीं जो कोलाहल उसळला तो थेट नभोमंडलालाच जाऊन थडकला. मग उरलेसुरले राजे व विराट आणि द्रुपद यांस बरोबर घेऊन धर्मराजा स्वतः बाहेर पडला. एकसारखे एक धनुर्धर जिच्यांत हिंडत आहेत अशी ती धृष्टद्युम्नाचे हाताखालील सेना कूच करूं लागली, त्या वेळीं सारखी दुथड भरून चाललेली गंगाचशी ती भासली. दुर्योधनानें, युधिष्ठिरानें सैन्याची रचना कसकशी केली आहे, ही बातमी काढलेली होती. ती त्याची माहिती खोटी पाडण्याकरितां युधिष्ठिरानें पहिली व्यवस्था मोडून पुनः नवीन योजना केली. ती अशीः महाधनुर्धर अभिमन्यु द्रौपदीचे पुत्र, नकुल, सहदेव, सर्व प्रभद्रक, दशसहस्र अश्व, दोन हजार गज, दहा हजार पायदळ, पांचशें रथी इतक्या निवडक वीरांची टोळी करून ती भीष्माचे हाताखालीं दिली. विराट, जयत्सेन, गदा व धनुष्य धारण करणारे महारथी युधामन्यू व उत्तमौजा यांची एक मध्यम टोळी केली. या टोळींतूनच कृष्णार्जुन हे फिरत होते व ते सर्वांना प्रोत्साहन देत असल्यानें सैन्यांतील सर्व लोकांना वीरश्री चढून प्रहार करण्याविषयीं ते अगदीं उद्युक्त झाले होते. या टोळीबरोबर, वर शूर पुरुष चढलेले असे वीस हजार अश्व, पांच हजार गज, आणि सर्वभर व्यापून रथसमुदाय चालले होते, व त्याशिवाय हातांत गदा, खड्गें, धनुष्यें घेऊन हजारों शूर योद्धे तिच्या अघाडीला तसेच पिछाडीलाही चालले होते.

---

१मूळांत ' अभिमन्युं वृहंतं च ' असा पाठ आहे. अर्थ धि [illegible] अभिमन्यु असाही होतो व अभिमन्यु आणि [illegible] नामक राजा असाही शक्य आहे.

राजा युधिष्ठिर जातीनें ज्या टोळींत होता, ती समुद्राप्रमाणें अफाट असून ठिकठिकाणचे राजे राजे तेवढे त्याच तुकडींत होते. शिवाय हजारों हत्ती, दहा दहा हजार अश्वांचे समुदाय, सहस्रावधि रथ तसेच पदातिही समागमें होते. प्रचंड सैन्यासह चेकितान व चेदिसेनांचा नायक धृष्टकेतु हेही याच टोळीबरोबर होते. वृष्णिवीर महारथी धनुर्धर सात्यकि एक लक्ष रथ्यांना बरोबर घेऊन शिपायांना हुकूम फर्मावीत चालला होता. ब्रह्मदेव व क्षत्रदेव या नांवांचे श्रेष्ठ वीर सैन्याची पिछाडी संभाळून चालले होते. सामानाचे खटारे, व्यापारी, वेश्या, रथादि यानें सर्व प्रकारचीं वाहनें, हजारों हत्ती, अयुतावधि घोडे, स्त्रिया, कृश, पंगु वगैरे युद्धाला निरुपयोगी अशी फालतू मंडळी, द्रव्यकोश, धान्यकोश इत्यादि सामान हत्तींवर लादून सर्व लटांबरासह युधिष्ठिराची स्वारी हळूहळू चालली होती. खऱ्या धैर्याचा व युद्धाविषयीं हुटहुटलेला सोचित्ति, श्रेणिमान् व समर्थ काश्यपुत्र वसुदान हेही मागोमाग चालले होते. वीस हजार रथ व त्यांचे बरोबरचीं माणसें; किणिकिणि आवाज करणाऱ्या अलंकारांनीं युक्त असे दहा कोट अश्व; मोठे झुंजार, मेघांप्रमाणें भव्य व गतिमान्, अस्सल जातिवंत व नांगरांप्रमाणें लांब दांतांचे असे वीस हजार मदमत्त गज; व यांशिवाय असे तसे सत्तर हजार गज---इतकी सेना संग्रामांत युधिष्ठिराबरोबर होती. गंडस्थळांतून मदस्राव होत असल्यानें वृष्टि करणारे मेघच, अथवा ज्यांवरून ओढे वाहात आहेत असे चालते पर्वतच कीं काय असे दिसणारे ते हत्ती युधिष्ठिराचे मागून चालले होते.

याप्रमाणें त्या बुद्धिमान् कुंतीपुत्र युधिष्ठिराचें मुख्य सैन्य होतें व याच्याच बळावर युधिष्ठिरानें दुर्योधनाशीं टक्कर दिली. याशिवाय इतरही सैनिक हजार-हजारांच्या, दहा दहा हजारांच्या टोळ्या करून आनंदानें पाठोपाठ चालले होते व हर्षभरानें एकाच वेळीं हजारों दुंदुभि व अयुतावधि शंख फुंकीत होते.

**उद्योगपर्व समाप्त.**